# महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी-१६१९/प्र.क्र.४३/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०२०

विषय :- पुणे (पुरंदर) विमानतळाच्या विकासासाठी संयुक्त कंपनी/ विशेष हेतू कंपनी स्थापन करण्याबाबत महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस निधी वितरीत करण्याबाबत.

वाचा :- १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : पूरक-२०१९/प्र.क्र.९३/अर्थ-३, दिनांक ९/०७/२०१९.
२. मुख्य वित्तीय अधिकारी, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचे पत्र क्र. मविविकं/ मिहान/ ७३२, दि.१९/०८/२०१९

शासन ज्ञापन :-

राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी लेखाशिर्ष (३०५३ ०१६४) खाली महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस निधी वितरीत करण्यात येतो. सन २०१९-२० च्या पावसाळी अधिवेशनात लेखाशीर्ष ३०५३-०१६४ खाली एकूण रु.२२५.०० कोटी (पुरंदर विमानतळ संयुक्त कंपनी स्थापन करण्यासाठी रु.१५०.०० कोटी + राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी रु.७५.०० कोटी) एवढी तरतूद पुरवणी मागणी म्हणून उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे.

२. यापैकी पुणे (पुरंदर) विमानतळ संयुक्त कंपनी स्थापन करण्यासाठी मंजूर रु.१५०.०० कोटी निधीपैकी ३० टक्के मर्यादेत म्हणजेच रु.४५.०० कोटी निधी लेखाशीर्ष ३०५३-०१६४ मधील "बाब क्र.३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" खाली महाराष्ट्र विमानतळ विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**योजनेचे नाव- मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)**

| अ.क्र. | बाब क्र. | सन २०१९-२० ची एकूण मंजूर तरतूद | बी.डी.एस.वर यापूर्वी वितरीत करण्यात आलेली रक्कम | आता वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | मूळ - ६५,००,००,०००<br>पुरवणी मागणी-२२५,००,००,०००<br>------------------------------<br>एकूण- २९०,००,००,००० | ८४,००,००,००० | ४५,००,००,००० |
| | | | एकूण | रु. ४५,००,००,००० |

**(अक्षरी रक्कम रुपये पंचेचाळीस कोटी फक्त )**

३. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. हे शासन ज्ञापन वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३६६/२०१९/व्यय-४, दि.२६.११.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत असून वित्त विभागाच्या दि.९/०७/२०१९ रोजीच्या परिपत्रकातील प्रत्येक अटीची पूर्तता करण्यात आली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२००२०४१२५६४७५३०७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Bharat Budhaji Gawade

Digitally signed by Bharat Budhaji Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc303d0b23c9b2e6456454666136340 0c4a360e6c6fbdefca273e2f5d2a43be7, serialNumber=af4e3993e4dd3610fcb21aece361e641ad3d33d96f04d57673c4fca72eb10c92, cn=Bharat Budhaji Gawade
Date: 2020.02.05 10:58:59 +05'30'

**( भ. बु. गावडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक/उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
३. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
६. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती.